# महाराष्ट्र शासन

क्र.कअनि १११८/प्र.क्र. १४५/१४-ब
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक - २२.०१.२०१९

प्रति,

सह/उप सचिव (आस्थापना),
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

**विषय** - राज्य माहिती आयोगाच्या खंडपीठातील कक्ष अधिकारी या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याबाबत

**संदर्भ**:- सा.प्र.वि.शा.नि.क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१२०/कार्या-१४, दिनांक ३१.०८.२०१७

महोदय/ महोदया,

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत कार्यपध्दती विहीत करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयातील कार्यपध्दतीस अनुसरून राज्य माहिती आयोगाच्या खालील खंडपीठांमधील कक्ष अधिकारी संवर्गातील रिक्त पदे प्रतिनियुक्तीने भरण्याकरिता मंत्रालयीन विभागातील कक्ष अधिका-यांकडून इच्छूकता मागविण्यात येत आहे.

| अ.क्र. | खंडपीठाचे नाव | पदे |
|---|---|---|
| १ | बृहन्मुंबई खंडपीठ, मुंबई | ०२ |
| २ | नागपूर खंडपीठ, नागपूर | ०१ |
| ३ | अमरावती खंडपीठ, अमरावती | ०१ |

२. सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, सदर पत्र आपल्या विभागाच्या आस्थापनेवरील कक्ष अधिकाऱ्यांच्या तात्काळ निदर्शनास आणावे. त्यानुसार प्रतिनियुक्तीसाठी इच्छूकता दर्शविलेल्या कक्ष अधिकाऱ्यांची सोबतच्या विवरणपत्रामधील माहिती विभागाच्या सचिवांच्या मान्यतेने या विभागास दिनांक ३१.०१.२०१९ पर्यंत उपलब्ध करून द्यावी. इच्छुक कक्ष अधिकाऱ्यांनी एकदा दर्शविलेली इच्छुकता परत मागे घेता येणार नाही.

३. सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०१९०१२२११३४४४२५०७ असा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

आपला,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2019.01.22 11:41:10 +05'30'

(ग.भि.गुरव)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**सोबत - वरीलप्रमाणे.**

**प्रत,**

अवर सचिव (कार्यासन ६), सामान्य प्रशासन विभाग, , मंत्रालय, मुंबई ३२.

## विवरणपत्र

### वैयक्तिक माहिती

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>मुद्दा</th><th>तपशिल/अभिप्राय</th></tr>
<tr><td>१</td><td>अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे संपूर्ण नाव</td><td></td></tr>
<tr><td>२</td><td>जन्मदिनांक</td><td></td></tr>
<tr><td>३</td><td>शैक्षणिक अर्हता</td><td></td></tr>
<tr><td>४</td><td>भ्रमणध्वनी क्रमांक</td><td></td></tr>
<tr><td>५</td><td>मागील ५ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छांयाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत.)</td><td></td></tr>
<tr><td>६</td><td>मत्ता व दायित्वे सादर केली आहेत का?</td><td></td></tr>
<tr><td>७</td><td>पदोन्नतीच्या विचारक्षेत्रात आहे का?</td><td></td></tr>
<tr><td>८</td><td>५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास)</td><td></td></tr>
<tr><td>९</td><td>संबंधित अधिकाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (पद व कालावधी)</td><td><table>
<tr><td>दिनांकापासून ते दिनांकापर्यंत</td><td>पद</td><td>प्रतिनियुक्तीचे ठिकाण</td></tr>
<tr><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td colspan="3">एकूण कालावधी</td></tr>
</table></td></tr>
<tr><td>१०</td><td>मागील प्रतिनियुक्तीवरून परत आल्याच्या दिनांकापासून ५ वर्षे पूर्ण झाली आहेत का?</td><td></td></tr>
<tr><td>११</td><td>संबंधित अधिकाऱ्यांविरूध्द विभागीय चौकशी सुरू अथवा प्रस्तावित आहे काय?</td><td></td></tr>
<tr><td>१२</td><td>प्रतिनियुक्तीकरीता निवड झाल्यास विभाग कार्यमुक्त करेल किंवा कसे.</td><td></td></tr>
</table>